**डॉ. आंबेडकर नगर कफ परेड, मुंबई येथील झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एस-१०/२०१८/प्र.क्र.१९८/फ-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ०८ सप्टेंबर, २०२०.

**पहा :-**

महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाकडील प्रकरण क्र.एम.ए.एस./प्र.क्र.४२०१/२०१७ मध्ये दिनांक ३०.१२.२०१९ रोजी पारित केलेले आदेश.

**प्रस्तावना :-**

डॉ. आंबेडकर नगर कफ परेड, मुंबई येथील अनधिकृत झोपडया सन २०१७ मध्ये कांदळवन कक्षामार्फत / वन विभागामार्फत निष्कासीत करण्यात आल्या होत्या. सदर कारवाईच्या विरोधात घर बचाओ घर बनाओ आंदोलन या सामाजिक संस्थेमार्फत महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाकडे तक्रार दाखल केली आहे. प्रस्तुत प्रकरणी (प्रकरण क्र.एम.ए.एस./प्र.क्र.४२०१/२०१७ मध्ये) महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाने दिनांक ३०.१२.२०१९ रोजी खालील प्रमाणे आदेश पारित केले आहे :-

*A) Chief Secretary, State of Maharashtra to constitute a committee of experts, comprising of Senior Officer from Slum Rehabilitation Authority, MHADA, Forest and Revenue Department to examine and formulate a concrete project for rehabilitation of the slum dwellers Ambedkar Nagar, Cuffe parade, Mumbai, about १५०० in number as per the list annexed with the complaint and submit its recommendations for necessary approval by the Government, within three months from the date of receipt of this order.*

*B) The committee so constituted would have all the powers of examining the records of the claim of the aforesaid slum dwellers, examine them or representative if necessary, scrutinize the documents of their claim and adjudicate their eligibility and then make recommendations for their rehabilitation.*

*C) The entire process of completion of inquiry by the committee should be on priority basis and be completed within the time framed fixed by this Commission and report compliance for further necessary compliance.*

डॉ. आंबेडकर नगर कफ परेड, मुंबई येथील झोपडपट्टीवासियांच्या पुनर्वसनाचा ठोस प्रकल्प तयार करुन शासनाच्या मान्यतेस्तव सादर करण्याकरिता मा.मुख्य सचिव यांनी महसूल व वन विभाग, म्हाडा व झोपडपट्टी पुर्नवसन प्राधिकरणाच्या तज्ञ व वरिष्ठ अधिकाऱ्यांची समिती गठीत करावी, अशा सूचना उपरोक्त आदेशान्वये महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाने दिल्या आहेत. सदर आदेशाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सदर समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाच्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने डॉ. आंबेडकर नगर कफ परेड, मुंबई येथील झोपडपट्टीवासियांच्या पुनर्वसनाचा ठोस प्रकल्प तयार करुन शासनाच्या मान्यतेस्तव सादर करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे -

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (गृहनिर्माण) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| ३ | मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुर्नवसन प्राधिकरण. | सदस्य सचिव |
| ४ | उप संचालक व मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा | सदस्य |
| ५ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई | सदस्य |
| ६ | जिल्हाधिकारी, मुंबई शहर | सदस्य |

**समितीचे कार्य :-**

१) सदर समिती महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाने पारित केलेल्या दिनांक ३०.१२.२०१९ रोजीच्या आदेशाची अंमलबजावणी करेल.

२) प्रकरणी १५०० झोपडपट्टीवासियांच्या दाव्यांच्या नोंदींचे परीक्षण करणे, सदर दावेदारांची किंवा आवश्यक असल्यास प्रातिनिधीक स्वरुपात तपासणी करण्याचे, त्यांच्या दाव्याची कागदपत्रे तपासून त्यांची पात्रता ठरविण्याची आणि नंतर त्यांच्या पुनर्वसनासाठी शिफारशी करण्याचे सर्व अधिकार सदर समितीस राहतील.

३) समितीने सदर चौकशी प्राथम्याने तसेच आयोगाने निश्चित केलेल्या मुदतीत पूर्ण करावी.

४) चौकशीअंती समितीने शिफारशींसह आपला अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०८१६२७०६७९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.09.08 16:31:58 +05'30'

( अरविंद आपटे )
मुख्य वन संरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) प्रधान सचिव (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
८) व्यवस्थापकीय संचालयक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (MHADA).
९) जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण.
११) महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई.